**शासकीय तंत्रनिकेतन, अचलपूर (अमरावती) या संस्थेकरीता नवीन स्वीय प्रपंची लेखा (PLA) खाते उघडण्यास मंजूरी देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्वीप्रले-३६१८/(प्र.क्र.४१/१८)/तांशि-३,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- २८ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :
१) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१००२/प्र.क्र.६१०/२००२/आस्था-१, दि.११ नोव्हेंबर, २००२.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमयुएन-२०१५/प्र.क्र.१४४/नवि-१८, दि.१६ मार्च, २०१७.
३) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.मान्यता-२०१७/प्र.क्र.६९/१७/तांशि-५, दि.६ जुलै, २०१७.
४) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.मान्यता-२०१७/प्र.क्र.६९/१७/तांशि-५, दि.१८ नोव्हेंबर, २०१७.
५) संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांचे पत्र क्र.६/पीएलए/खा.उ.प./अचलपूर/२०१८/११३६४, दि.१५ फेब्रुवारी, २०१८.

**शासन निर्णय :-**

संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांनी संदर्भाधीन दि.१५ फेब्रुवारी, २०१८ च्या पत्रान्वये शासकीय तंत्रनिकेतन, अचलपूर या संस्थेकरीता नवीन स्वीय प्रपंची लेखा (PLA) खाते उघडण्यास परवानगी मिळणेकरीता प्रस्ताव सादर केला होता. त्यानुषंगाने शासकीय तंत्रनिकेतन, अचलपूर या संस्थेकरीता प्राचार्य यांच्या नावे नवीन स्वीय प्रपंची लेखा (PLA) खाते उघडण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. स्वीय प्रपंची लेखा (PLA) खात्यामध्ये पुढील बाबींचा समावेश असेल.:-

१) सुरक्षा ठेव (Security Deposit)
२) जीमखाना शुल्क (Gymkhana Fees)
३) स्नेहसंमेलन शुल्क (Gathering Fees)
४) प्रशिक्षण व आस्थापना शुल्क (Training and Establishment Fees)
५) विद्यार्थी विकास निधी (Student Development Fund)
६) ग्रंथालय शुल्क व इंटरनेट शुल्क (Library Fess and Internet Fees)
७) अनुसूचित जाती/जमाती विद्यार्थ्यांची शिष्यवृत्ती रक्कम (Scholarship of SC/ST Students)

३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१, मुंबई यांनी हे खाते उघडण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून परवानगी दिली आहे:-

१) सदर स्वीय प्रपंजी लेखा खात्यात वेळोवेळी आर्थिक व्यवहार होणे आवश्यक आहे. तसेच सदर लेखा खाते बंद पडणार नाही, याची दक्षता संबंधित प्रशासक/कार्यालयाने घ्यावी.
२) नियमानुसार सदर लेखा खात्याच्या व्यवहारांचे ताळमेळ (Reconciliation) व परिक्षण याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित प्रशासक/कार्यालयाची राहील.
३) सदर स्वीय प्रपंची लेखा (PLA) खात्याचे नियमित लेखापरिक्षण करण्यात येईल.
४) स्वीय प्रपंची लेखा (PLA) खाते प्रशासकाने योग्यरित्या हाताळावे.
५) स्वीय प्रपंची लेखा (PLA) खाते हे महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - दोन, नागपूर यांनी संबंधित कोषागारास प्राधिकारपत्र दिल्यानंतर उघडण्यात यावे.
६) या स्वीय प्रपंची लेखा (PLA) खाते करीता महाराष्ट्र कोषागार अधिनियम-१९६८ व लेखा नियम मधील सर्व शर्ती लागू असतील.

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३४९/२०१८/कोषा-५, दि.७ सप्टेंबर, २०१८ अन्वये प्राप्त सहमतीनुसार आणि महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-एक, महाराष्ट्र, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.TM/Ch.2/UOR/H and T Education Department/2018-19/828, दि.०२ नोव्हेंबर, २०१८ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१८११२८१२३५१७६५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.11.28 15:45:16 +05'30'

**( संजय धारुरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर (यांना त्यांच्या इंग्रजी अनौपचारीक संदर्भ क्र.TM/Ch.2/UOR/H and T Education Department/2018-19/828, दि.०२ नोव्हेंबर, २०१८ च्या संदर्भाच्या अनुषंगाने पुढील आवश्यक त्या कार्यवाहीकरिता अग्रेषित)

**प्रतः-**

१. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, अमरावती.
३. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, अमरावती.
४. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, अचलपूर, जि.अमरावती.
५. कक्ष अधिकारी, तांशि-५, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. कक्ष अधिकारी, कोषा-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, साशि-१, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती/तांशि-३.